**महाराष्ट्र लोकसेवा हक्क अधिनियम, २०१५ च्या कलम-३ मधील तरतूदींच्या अनुषंगाने इतर मागास बहुजन कल्याण विभागांतर्गत असलेल्या क्षेत्रिय कार्यालयामार्फत सेवा उपलब्ध करुन देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागास बहुजन कल्याण विभाग**
**शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२१/प्र.क्र.४१/ आरटीएस**
**मंत्रालय विस्तार भवन, मुंबई - ४०००३२**
**दि. १३ डिसेंबर, २०२१**

वाचा :- महाराष्ट्र लोकसेवा हक्क अधिनियम, २०१५ (सन २०१५ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ३१)

**प्रस्तावना :-**

राज्य शासनामार्फत राज्यातील पात्र व्यक्तींना पारदर्शक, कार्यक्रम व कालमर्यादेत लोकसेवा उपलब्ध करुन देण्यात येते. तसेच लोकांच्या स्थानिक प्रशासनाकडून वाढत्या अपेक्षा विचारात घेऊन त्यांना तत्पर व दर्जेदार सेवा विहित कालमर्यादेत उपलब्ध करुन देण्याच्या दृष्टीने लोकसेवा हक्क अधिनियम, २०१५ प्रख्यापित केला असून तो दि.२८.०४.२०१५ रोजी लागू करण्यात आला आहे. या अधिनियमातील कलम ३ मध्ये नमूद करण्यात आलेल्या सार्वजनिक प्राधिकारणाने सदर अधिनियम लागू झाल्यानंतर ३ महिन्याच्या कालावधीत आणि वेळोवेळी पुरवित असलेल्या लोकसेवा, पदनिर्देशित अधिकारी, प्रथम व द्वितीय अपिलीय अधिकारी आणि नियत कालमर्यादा या सदर अधिनियमाखाली अधिसूचित करणे आवश्यक आहे. सदरहू निर्गमित करण्यात आलेल्या सार्वजनिक प्राधिकरणाने त्यांचे मार्फत पुरविण्यात येत असलेल्या सेवा सदर अधिनियमांतर्गत अधिसूचित करुन त्याप्रमाणे संबंधित सेवा पुरविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :-

इतर मागास बहूजन कल्याण या विभागाच्या प्रशासकीय अधिपत्याखाली संचालक, इतर मागास बहूजन कल्याण विभाग, या कार्यालयाशी संबंधित सर्व अधिकारी, सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण सर्व सहायक आयुक्त, समाज कल्याण सर्व जिल्हा समाज कल्याण अधिकारी, सदस्य सचिव, राज्य मागासवर्ग आयोग, सर्व मुख्याध्यापक, अधिक्षक, गृहपाल वसतिगृह यांचा समावेश आहे. राज्यातील या विभागाच्या अधिपत्याखालील क्षेत्रिय व स्थानिक कार्यालयामार्फत पुरविण्यात येणाऱ्या विविध सेवा-सुविधांचा लाभ राज्यातील लोकांना/नागरिकांना उपलब्ध करुन देण्याच्या दृष्टीने महाराष्ट्र लोकसेवा हक्क अध्यादेश २०१५ च्या कलम ३ मधील तरतूदीनुसार सोबत जोडलेल्या प्रपत्र-अ मधील सेवा पुरविण्यास शासनाची मंजूरी देण्यात येत आहे.

.२ सदर प्रपत्र-अ येथे नमूद सेवा महाराष्ट्र लोकसेवा हक्क अध्यादेश मधील ३ मधील कलम २०१५ तरतूदीनुसार संचालक, इतर मागास बहूजन कल्याण विभाग, पुणे यांनी त्यांच्याशी निगडित असलेल्या सेवा अधिसुचित कराव्यात आणि सदरील सेवा लोकांनाना/गरिकांना विहित मुदतीत उपलब्ध करुन देण्याबाबत आवश्यक ती कार्यवाही करावी .

३. सोबत जोडलेल्या प्रपत्र-अ मध्ये नमूद केलेल्या सेवा ज्या कार्यालयामार्फत पुरविण्यात येणार आहेत त्यासाठी या अधिनियमांतर्गत सेवा पुरविण्याकरिता आकारावयाची फी निश्चित करण्याची मुभा संबंधीत कार्यालय प्रमुखांना राहील. तसेच, सदरील सेवा पुरविण्यासाठी संबंधित कार्यालयाची रचना विचारात घेऊन पदनिर्देशीत अधिकारी, प्रथम अपिलीय अधिकारी, द्वितीय अपीलीय अधिकारी, यांना बदल करावयाचे अधिकार संबंधीत कार्यालय प्रमुखांना असतील. तथापि, अधिसुचित केलेल्या सेवा व विहित कालावधी यामध्ये बदल करावयाचे अधिकार कार्यालय प्रमुखांना असणार नाहीत.

४. महाराष्ट्र लोकसेवा हक्क अधिनियम २०१५ च्या कलम ३ (२) नुसार संचालक, इतर मागास बहुजन कल्याण, पुणे यांनी ते पुरवित असलेल्या लोकसेवांची सुची, नियत कालमर्यादा, विहित नमूना किंवा शुल्क, पदनिदेर्शित अधिकारी, प्रथम अपिलीय अधिकारी व द्वितीय अपीलीय अधिकारी यांचा तपशील कार्यालयाच्या सुचना फलकावर आणि तसेच संकेतस्थळावर किंवा पोर्टलवर प्रदर्शित करावा व तशा सुचना त्यांच्या अधिनस्त/क्षेत्रीय कर्यालयांना देण्यात याव्यात.

५. महाराष्ट्र लोकसेवा हक्क अधिनियम २०१५ अंतर्गत सदर शासन निर्णयासानुसार अधिसूचित केलेल्या सेवांची अंमलबजावणी करण्याची कार्यवाही अधिसूचनेच्या तारखेपासून सुरु करण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२११२१४११५६४०६३२२ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात आलेला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावांने,

Siddharth A Zalte

Digitally signed by Siddharth A Zalte
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=dc54b49c6f5c903027053476b3a6ef50b46ff44a7e8b820fef7bfdd100c56194, pseudonym=4334586425E30572257A4DC1B0FDB4F8B475B4D3, serialNumber=8EA004AE581D6FF06989D826800FF7528B6FD6418579108C011AE21079E9E0C9, cn=Siddharth A Zalte
Date: 2021.12.14 12:09:36 +05'30'

**( सिध्दार्थ अ. झाल्टे )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. विरोधी पक्षनेते, विधानसभा/विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई

२) सर्व सन्मा. विधानसभा/विधानपरिषद सदस्य व संसद सदस्य,

३) मा. राज्यपाल महोदय यांचे सचिव,

४) मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव,

५) सर्व मा. मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,

६) मा. लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, (पत्राने)

७) मा. मुख्य माहिती आयुक्त व राज्य माहिती आयुक्त यांचे कार्यालय, (पत्राने)

८) मा. राज्य निवडणुक आयोग यांचे कार्यालय,

९) मा. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई

१०) सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई

११) मा. मुख्यमंत्री महोदय यांचे जनसंपर्क अधिकारी
१२) प्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई / नागपूर / औरंगाबाद / (पणजी) खंडपीठ, (पत्राने)
१३) सर्व विभागीय आयुक्त,
१४) संचालक, इतर मागास बहूजन कल्याण विभाग, महाराष्ट्र राज्य, पुणे,
१५) सर्व जिल्हाधिकारी
१६) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
१७) सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण,
१८) सर्व जिल्हा समाज कल्याण अधिकारी,
१९) सर्व सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण
२०) सर्व महानगर पालिका आयुक्त,
२१) सर्व नगर परिषद / नगरपालिका / नगर पंचायती यांचे मुख्य अधिकारी
२२) सर्व मंत्रालयीन विभाग
२३) इतर मागास बहुजन कल्याण विभागातील सर्व कार्यासने,
२४) निवड नस्ती-आर.टी.एस.

## प्रपत्र - अ

### शासन निर्णय, इतर मागास बहुजन विभाग शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२१/प्र.क्र.४१/ आरटीएस, दि. १३ डिसेंबर, २०२१ चे प्रपत्र

| अ. क्र. | सेवेचे नाव | सेवा पुरविणारा अधिकारी (पदनाम) | कालावधी | प्रथम अपिलीय अधिकारी | द्वितीय अपिलीय अधिकारी |
|---|---|---|---|---|---|
| १ | परदेशी शिष्यवृत्ती | संबंधित प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण. | ऑक्टोबर अखेर | सह संचालक (शिक्षण), इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे | संचालक इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे |